राज्यात औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकासा संदर्भात प्राप्त प्रस्तावांना निधी उपलब्ध करुन देणेबाबत. वित्तीय वर्ष २०१६-१७ करीता. (पैठण मेगा फूड पार्क, धनगांव, ता. पैठण, जि.औरंगाबाद - धनगांव ते वाहेगाव जोडरस्ता).

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. औपासू- २०१६/प्र.क्र.१९१/उद्योग-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २९ मार्च, २०१७

**विषय** : राज्यात औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकासा संदर्भात प्राप्त प्रस्तावांना सन २०१६-१७ या वित्तीय वर्षाकरीता निधी उपलब्ध करुन देण्याबाबत (पैठण मेगा फूड पार्क, धनगांव ता. पैठण, जि.औरंगाबाद- धनगाव ते वाहेगाव जोडरस्ता)

**संदर्भ** : १) शासन निर्णय क्र. आयआयआय पॉलिसी २०१०/प्र.क्र.७६८/उद्योग-२, दि.२२.२.२०१३
२) शासन निर्णय क्र.औपासू २०१२/प्र.क्र.२३४/उद्योग-२, दिनांक २५.२.२०१४
३) दि.३१.१२.२०१५ रोजी झालेल्या सुकाणू समितीच्या तिसऱ्या बैठकीचे इतिवृत्त दि.०८.०३.२०१६
४) शासन शुध्दीपत्रक क्र.औपासू-२०१६/प्र.क्र.२१९/उद्योग-२, दि.२०.१२.२०१६
५) प्रधान सचिव (उद्योग ) यांचेकडील दिनांक ०९/०३/२०१७ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
६) विकास आयुक्त (उद्योग) यांचे क्र. उसं/साप्रोयो/पायाभूत सुविधा/पैठण मेगा फूड पार्क/ २०१७/अे-६०१, दिनांक १५/०३/२०१७ रोजीचा प्रस्ताव.
७) दिनांक १५/०३/२०१७ रोजी झालेल्या सुकाणू समितीच्या चौथ्या बैठकीचे इतिवृत्त दिनांक २३/०३/२०१७.
८) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.औपासू- २०१६/प्र.क्र.१९१/उद्योग-२, दिनांक २४ मार्च, २०१७.

**शासन निर्णय :**

राज्यात औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकास या योजनेअंतर्गत मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील “महाराष्ट्र औद्योगिक पायाभूत सुविधा विकास समिती” च्या दिनांक १५.०३.२०१७ रोजी झालेल्या बैठकीत दिलेली मान्यता व संदर्भ क्र. ८ अन्वये दिलेली प्रशासकीय मान्यता विचारात घेऊन, निधीच्या उपलब्धतेनुसार मे. पैठण मेगा फुड पार्क, धनगांव जि. औरगांबाद येथील पैठण राज्य महामार्ग क्र. ३० येथून धनगाव ते वाहेगाव या एकूण ९६० मीटर लांबीचा व ८.५० मी. रुंदीचा जोडरस्ता या प्रकल्पासाठी एकूण रु.१,६७,४८,०००/- (रुपये एक कोटी सदुसष्ट लाख अठ्ठेचाळीस हजार फक्त) इतकी रक्कम विकास आयुक्त(उद्योग) यांनी आहरण करुन महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ या कार्यान्वयन यंत्रणेकडे सुपूर्द करण्यास, खालील अटींच्या अधिन राहून शासन याव्दारे मान्यता देत आहे.

१) सदर प्रकल्पांचे नकाशे व अंदाजपत्रकास महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने तपासणी करुन देण्यात आलेल्या तांत्रिक मान्यतेच्या अधिन राहील.

२) सोबतच्या पत्रात नमूद केलेल्या खर्चाचे काम पूर्ण होईपर्यंत झालेल्या प्रकल्पाच्या खर्चातील वाढ ( Cost Escalation ) महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ स्वत:च्या निधीतून उपलब्ध करुन कामे पूर्ण करणे आवश्यक राहील.

३) सदर चा रस्ता हा जिल्हा परिषदेच्या मालकीचा असल्याने व शासनाकडून पायाभूत सेवांसाठी निधी उपलब्ध करुन देण्यात येत असल्याने सदर प्रकल्पांवरील देखभाल दुरुस्ती जिल्हा परिषद औरंगाबाद यांनी स्वत:च्या निधीतून करावी. तसेच प्रस्तुत रस्त्यांवर टोलची आकारणी करु नये. याबाबत जिल्हा परिषद औरंगाबाद यांनी उद्योग संचालनालयाशी करारनामा करावा.

४) सदर प्रकल्पांवर अन्य कोणताही विभाग अथवा संस्थांकडून खर्च झालेला नाही याची खातरजमा कार्यान्वयन यंत्रणेने (महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने) करुन घ्यावी.

५) शासन निर्णय क्र.औपासू-२०१२/प्र.क्र.२३४/उद्योग-२, दिनांक २५.२.२०१४ मधील कार्यपध्दती व मार्गदर्शक तत्वांचे पालन आहरण व संविरण अधिकारी व कार्यान्वयन यंत्रणा यांनी कराव्यात.

६) कार्यान्वयन यंत्रणा उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी संदर्भात प्रकल्पनिहाय उपयोगिता प्रमाणपत्र व कामाचा पूर्तता अहवाल विकास आयुक्त(उद्योग) यांनी शासनास सादर करावा.

७) विकास आयुक्त (उद्योग) यांनी ३१.०३.२०१७ पर्यंत खर्च होणारा निधी कोषागरेमधून काढावा व जास्तीचा निधी कोषागरेमधून काढून अन्य संस्थांकडे जमा करु नये.

२. ही शासन मान्यता संदर्भीय क्र. ७ येथे नमूद केलेल्या सुकाणू समितीच्या दिनांक १५.०३.२०१७ रोजी झालेल्या बैठकीमध्ये प्राप्त मंजूरी व सदरहू बैठकीतील सूचनांनुसार अवलंबवायच्या कार्यपध्दती, प्रधान सचिव (उद्योग), यांचेकडील संदर्भाधीन क्र. ५ येथे नमूद बैठकीत झालेला निर्णय तसेच उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.औपासू-२०१२/प्र.क्र.२३४/उद्योग-२, दिनांक २५.२.२०१४ मधील तरतूदीच्या अधीन राहील. कार्यान्वयन यंत्रणेने व आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर तरतूदीप्रमाणे कार्यवाही करावी.

३. सदर कामासाठी येणारा खर्च लेखाशीर्ष क्र.के-१०, मुख्य लेखाशीर्ष, "४८७५, इतर उद्योगावरील भांडवली खर्च" उपलेखाशीर्ष ६०-इतर उद्योग, ८०० इतर खर्च,८०० (००) (०१), "औद्योगिक पायाभूत सुविधांचा विकास व निर्मिती" (योजनांतर्गत) (४८७५-००२५) या योजनेखाली वित्तिय वर्ष २०१६-१७ करिता मंजूर असलेल्या निधीमधून भागविण्यात यावा.

४. सदर प्रकल्पांची सुरुवात सन २०१६-१७ या आर्थिक वर्षापासून करण्यात यावी.

५. मे. पैठण मेग फुड पार्क, धनगांव जि. औरगांबाद येथील पैठण राज्य महामार्ग क्र. ३० येथून धनगाव ते वाहेगाव जोडरस्ता या प्रकल्पासाठी एकूण रु.१,६७,४८,०००/- (रुपये एक कोटी सदुसष्ट लाख अठ्ठेचाळीस हजार फक्त) एवढ्या रकमेच्या आहरणाचे आणि महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळास

वितरित करण्याचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांचे कार्यालयातील लेखाधिकारी यांना देण्यात येत आहेत.

७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांना कळविण्यात येते की, सदर रकमांचे धनादेश,"मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई," यांचे नांवे काढून त्यांना अदा करण्यात यावे.

८. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडून प्राप्त करुन, विकास आयुक्त(उद्योग) यांनी शासनास सादर करावे.

९. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २० एप्रिल,२०१६ व त्या सोबतचे परिशिष्ट नुसार असे प्रमाणित करण्यात येते की, प्रस्तुत प्रकल्पाच्या खर्चाच्या बाबीस संदर्भ क्र. ८ अन्वये प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्यात आलेली आहे. सदर योजना प्रथमच हाती घेण्यात येत आहे. सबब मागील निधीच्या विनियोगाचा प्रश्न उद्भवत नाही. प्रस्तुत बाबीस प्रथमच अनुदान वितरित केले जात असल्याने लेखा आक्षेप नाहीत. ही योजना वैयक्तिक लाभार्थ्यांची नाही. या सर्व बाबी लक्षात घेऊन प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार वरील निधी वितरित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१७०३२९१७००४९७८१० असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Shamkant Degaonkar

Digitally signed by Sanjay Shamkant Degaonkar
DN: c=IN, o=Industry, Energy and Labour Department, ou=Government Of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79, serialNumber=56cf8c8577584adc42f070185c585c41084cc34f6683553d21ccacbfa33d4d1f, cn=Sanjay Shamkant Degaonkar
Date: 2017.04.28 17:20:20 +05'30'

( संजय देगांवकर )
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षण), मुंबई,
२) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षण), नागपूर,
३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
४) निवासी लेखा परीक्षण अधिकारी, मुंबई,
५) सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) विकास आयुक्त(उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई-४०० ०३२
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
८) मुख्य अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
९) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद.
१०) उद्योग सह संचालक, उद्योग सह संचालक कार्यालय, औरंगाबाद.
११) वित्त विभाग, (कार्यासन अर्थसंकल्प-१४/व्यय-१६) मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१२) नियोजन विभाग, (कार्यासन-१४६१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

१३) कक्ष अधिकारी(प्रशासन-१), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

१४) मे. पैठण मेगा फुड पार्क ( SPV ), धनगांव, जि. औरंगाबाद (विकास आयुक्त (उद्योग) यांचे मार्फत).

१५) निवडनस्ती (उद्योग-२).